पंचायत समिती जळकोट (जि.लातूर) येथील प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर व इतर उपकामांस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

ग्राम विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः पंसई-२०२१/प्र.क्र.११६/बांध-४

५ वा मजला, मर्झबान पथ, २५ बांधकाम भवन,

फोर्ट, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१

तारीख : २२ नोव्हेंबर, २०२१

**वाचा :-**

१) **शासन निर्णय क्रमांकः** ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. पंसई-२००८/प्र.क्र.३०६/पंरा-७, दिनांक १० सप्टेंबर, २००८.

२) **अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर यांचे पत्र क्रमांकः** जिपला/बांध/कार्या-०१/सीआर/कावि-६२१/२०२१, दिनांक २ ऑगस्ट, २०२१.

३) **अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर यांचे पत्र क्रमांकः** जिपला/बांध/कार्या-०१/सीआर/कावि-७६६/२०२१, दिनांक ६ सप्टेंबर, २०२१.

४) **अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर यांचे पत्र क्रमांकः** जिपला/बांध/कार्या-०१/सीआर/कावि-९०३/२०२१, दिनांक ४ ऑक्टोबर, २०२१.

**प्रस्तावना :-**

अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर यांनी वाचा मधील अनुक्रमांक २, ३ व ४ येथील पत्रांन्वये जळकोट पंचायत समितीच्या (जि.लातूर) प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर व इतर उपकामास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

**०२.** उक्त वाचा मधील अनुक्रमांक १ येथील दिनांक १० सप्टेंबर, २००८ रोजीच्या शासन निर्णयान्वये, पंचायत समिती जळकोट (जि.लातूर) येथील प्रशासकीय व निवासी इमारतीच्या बांधकामाच्या रू.४८८.२६ लक्ष इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली होती. पंचायत समिती जळकोट (जि.लातूर) येथील प्रशासकीय इमारतीचे बांधकाम विद्युतीकरण, पाणी पुरवठा, रस्ते, नाली बांधकाम, फर्निचर चे काम मंजूर होते. तसेच इमारत बांधकाम, विद्युतीकरण, पाणी पुरवठा, रस्ते व नाली बांधकाम इत्यादी कामे पुर्ण करण्यात आलेली आहेत व फर्निचरचे काम करण्यात आलेले नाही. तथापि, पंचायत समिती जळकोट नवीन इमारत बांधकाम पुर्ण झाल्यानंतर, पुर्वीच्या इमारती मधील जुने फर्निचर चांगल्या स्थितीत असल्यामुळे, जुन्या फर्निचरवर कार्यालयीन कामकाज चालू होते. सद्यस्थितीत जुने फर्निचर वापर करण्यास अयोग्य आहे. यास्तव अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर यांनी पंचायत

समिती जळकोट (जि.लातूर) येथील प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर व इतर उपकामाचे रू.२९७.४८ लक्ष किंमतीचे सविस्तर अंदाजपत्रक सादर केलेले आहे. सदर अंदाजपत्रक सन २०२०-२१ च्या दरसूचीवर आधारित असून ते कार्यकारी अभियंता (बां.), जिल्हा परिषद, लातूर, अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, उस्मानाबाद व मुख्य अभियंता, सा. बां. प्रा.वि., औरंगाबाद यांनी साक्षांकीत केलेले आहे.

**०३.** अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या तांत्रिक छाननी अंती, जळकोट पंचायत समितीच्या (जि. लातूर) प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर व इतर उपकामांच्या रूपये २९७.४८ लक्ष इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

जळकोट पंचायत समिती (जि. लातूर) प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर व इतर उपकामाच्या एकुण रूपये २,९७,४८,०००/- (रूपये दोन कोटी सत्याण्णव लक्ष अठ्ठेचाळीस हजार फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या कामांस पुढील अटींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) पंचायत समिती जळकोट (जि. लातूर), प्रशासकीय इमारतीकरिता शासन निर्णय, सा.बां.वि.क्र.सीएटी-१०९६/प्र.क्र.१७२/इमारती-२, दि.७.१.२००४ नुसार विहीत केलेल्या नोंदणीकृत फर्निचर/मॉड्युलर फर्निचर उत्पादक अथवा पुरवठादार/अंतर्गत सजावटकार यांच्याकडून विहीत कार्यपध्दती अनुसरुन फर्निचरचे काम करून घेणे बंधनकारक राहील.

२) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

३) या कामी प्रशासकीय मान्यता किंमतीपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती/जिल्हा परिषदेने सोसावा.

४) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त एका वर्षात पूर्ण होईल, असे संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद यांनी नियोजन करावे.

५) प्रस्तुत कामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.) जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

०२. पंचायत समिती जळकोट (जि.लातूर) प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर व इतर उपकामांच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढील प्रमाणे आहे.

| **General Abstract for Furniture and Sub Work of P. S. Jalkot Adm. Building, Dist. Latur** | | |
|---|---|---|
| Sr. No. | Description of item | Cost In Rs. |
| 1 | Furniture & Other sub - works | 22616069.00 |
| 2 | Add For Electrical work | 500000.00 |

| General Abstract for Furniture and Sub Work of P. S. Jalkot Adm. Building, Dist. Latur | | |
|---|---|---|
| Sr. No. | Description of item | Cost In Rs. |
| 3 | LCD Project & Accessories | 200000.00 |
| 4 | Sound System | 200000.00 |
| | **Total A (1 to 4)** | **23516069.00** |
| 5 | Add 12 % for GST | 2821928.00 |
| 6 | Add 4 % for Contingency | 940643.00 |
| 7 | Add 0.5 % for Insurance | 117580.00 |
| 8 | Add 10 % for Escalation & Increase in SSR | 2351607.00 |
| | **Total B (5 to 8)** | 6231758.00 |
| | **Total (A + B)** | 29747827.00 |
| | **Says Rs.** | **2,97,48,000/-** |

**०३.** उपरोक्त फर्निचर व इतर उपकामांसाठी संबंधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरूपात, टप्प्या- टप्प्याने निधी उपलब्ध करून दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यात येईल. यावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ ००५३)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**०४.** प्रस्तुतचा शासन निर्णय वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका,१९७८ भाग पहिला, उप विभाग-पाच, अ. क्र. १ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११२२१२१४३१११२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN DEVICHAND JAIN

Digitally signed by PRAVIN DEVICHAND JAIN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e86ac5658c4f446f46a56052bf048257ffe4ea09078de9d556ae5babe8adc8b1, pseudonym=37D9D56800E3803E7F4DEAA21F9F7FAB712736F6, serialNumber=481AF6EECE7C1D432D3119135BE703BF6529E7A455A9B17708C677B565D8EE24, cn=PRAVIN DEVICHAND JAIN
Date: 2021.11.22 15:40:11 +05'30'

**(प्रविण जैन)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा.विरोधी पक्षनेता विधानसभा/विधानपरिषद.
२) मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

४) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
५) अतिरिक्त मुख्य सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) सचिव (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
८) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
९) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर.
१०) अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर.
११) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर.
१२) कार्यकारी अभियंता (बां.), जिल्हा परिषद, लातूर.
१३) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा लातूर.
१४) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
१५) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
१६) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, लातूर.
१७) सभापती, पंचायत समिती, जळकोट, जि. लातूर
१८) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, जळकोट, जि. लातूर.
१९) निवडनस्ती, कार्यासन बांधकाम-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.